संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियान लेखाशिर्ष २२१५ २३११ खालील महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे शिल्लक अनुदान पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचेकडे सुपूर्द करुन त्यांच्या मार्फत अनुदान वितरणाची कार्यवाही करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः नास्वअ २०१४/प्र.क्र.९८/पापु-२१

गोकुळदास तेजलपाल हॉस्पिटील संकुल इमारत
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-१
तारीख: १२ जानेवारी,२०१५

**वाचा :-**

**शासन निर्णय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.नास्वअ २००७/प्र.क्र.६४/पापु-२१, दि.२६ ऑक्टोंबर,२००७**

**प्रस्तावना :-**

राज्याच्या नागरी भागामध्ये सन २००२-०३ पासून नागरिकांच्या सक्षम सहभागाने संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियान प्रत्येक वर्षाच्या दि.२ ऑक्टोंबर पासून पुढील वर्षाच्या दि.१४ नोव्हेंबर पर्यंत राबविण्यात येतो. सदर अभियानाअंतर्गत निश्चित केलेल्या निकषांतर्गत उल्लेखनिय कामगिरी करणा-या नागरी संस्थांना राज्यस्तरावर मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील पारितोषिक समारंभामध्ये रोख पारितोषिक व **भारतरत्न पंडित जवाहरलाल नेहरु स्वच्छ शहर** या सन्मानाने गौरविले जाते.

सदर अभियानाच्या पहिल्या व दुस-या फेरीची अंमलबजावणी अभियानाच्या कृती कार्यक्रमानुसार दि.२ ऑक्टोंबर ते ५ ऑगस्ट या कालावधीमध्ये संबंधित नागरी संस्थेने पूर्ण करणे आवश्यक आहे. तर राज्यस्तरीय फेरीची अंमलबजावणी ही राज्य शासनामार्फत दि.६ ऑगस्ट ते १५ सप्टेंबर या कालावधीत पूर्ण करुन दि.१४ नोव्हेंबर रोजी राज्यस्तरीय पारितोषिक वितरण समारंभ आयोजित करणे आवश्यक आहे.

विभागीय आयुक्त, तसेच महानगरपालिका यांच्याकडून सदर अभियानाची कार्यवाही वेळेत होत नसल्याने, किंबहुना आर्थिक वर्ष संपल्यावर कार्यवाही होत असल्याने, बक्षिस वितरणाच्या मंजूरीकरिता उशिर होतो. त्याकरिता प्रस्तुत योजनेसाठी अर्थसंकल्पित केलेला निधी अर्थसंकल्प

वितरण प्रणालीवर (BDS) वर उपलब्ध झाल्यानंतर, एकत्रितरित्या कोषागारातून आहरित करुन शासन आदेशान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे जमा केला जातो. शासनाचे आदेश प्राप्त झाल्यावर सदर निधी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत सदर योजनेसाठी बँकेत उघडण्यात आलेल्या स्वतंत्र खात्यात जमा करण्यात येतो. तद्नंतर शासनाच्या ओदशानुसार जमा निधीमधून सबंधित बक्षीसपात्र ठरलेल्या महानगरपालिका/नगरपालिका यांना बक्षिसाची रक्कम दिली जाते.

संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियानांतर्गत लेखाशीर्ष २२१५ २३११ खाली सन २००२-०३ पासून सन २०१३-१४ पर्यंत रु.६४५८.१८ लक्ष (अर्थसंकल्प पुस्तिकेनुसार) इतका अर्थसंकल्पित निधी या विभागाने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे जमा केलेला आहे. तथापि महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने जमा रक्कम रु. ६४३८.५० असल्याचे कळविलेले आहे.

सन २००२-०३ पासून ते २०१०-११ पर्यंत या योजनेंतर्गत रु.३५६७.५० लक्ष इतकी बक्षिसाची रक्कम वितरीत करण्यात आलेली आहे. तसेच पहिल्या फेरीकरिता व इतर प्रचार व प्रसिध्दीकरिता निधी वितरित करण्यात आलेला आहे. महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्याकडे शिल्लक **रु.१७२२.२२ लक्ष** त्यांच्या एकत्रित खात्यामध्ये स्वतंत्रपणे जमा केलेली आहे. त्यावरील व्याजाची परिगणना वर्षनिहाय केलेली नाही.

ग्रामीण क्षेत्रातील पाणी पुरवठा योजनांचे अनुदान हे पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (WSSO), सिडको भवन, बेलापूर यांचे लेखा कक्षाकडे आहरित व वितरीत करण्याची कार्यवाही होते. त्याच धर्तीवर ,सदर लेख्योच्या दुरुस्ती करण्याच्या कारणास्तव तसेच, सदर अभियांनांतर्गत लेख्यासंदर्भातील कामे सुरळीत सुरु राहण्याकरिता, नागरी क्षेत्रातील स्थानिक स्वराज्य संस्थांना संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियानांतर्गत देण्यात येणारे शासकीय अनुदान आहरण व वितरण करण्याची कार्यवाही पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (WSSO), यांचेकडे सोपवून, सदर संस्थेला याकरिता प्राधिकृत करण्याचे शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

१. संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियानांतर्गत मागणी क्र.वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग ३१, सहाय्यक अनुदाने, (वेतनेतर) (०२) संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियानाची अंमलबजावणी (०२)(०१) संत गाडगेबाबा स्वच्छता अभियानाची अंमलबजावणी, प्रचार, प्रसिध्दी व बक्षिस योजना (योजनेतर) २२१५ २३११ या योजनेचे अनुदान आहरित व वितरीत करण्याकरिता पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (WSSO),सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई यांना पुढील अटी व शर्तींच्या अधिन राहून प्राधिकृत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१) मजीप्राच्या लेखा विभागाने संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियानांतर्गत लेखाशिर्ष २२१५ २३११ संबंधित त्यांचेकडील लेखे बंद करुन **प्रथम त्याचा शासनाकडे वर्षनिहाय ताळमेळ घालून,**

शिल्लक व व्याजाच्या रक्कमेचे वेगवेगळे लेखे ठेवण्याकरिता, स्वतंत्रपणे पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (WSSO ), बेलापूर. नवी मुंबई यांचेकडे सुपूर्द करावी.

२) या अभियानासाठी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (WSSO), नवी मुंबई, बेलापूर यांनी स्वतंत्र खाते बँकेत उघडून त्या खात्यामध्ये संचालक (वित्त) महा.जीवन प्राधिकरण,यांनी सुपूर्द केलेली रक्क्म ठेवावी. त्यामध्ये व्याजाची रक्कम स्वतंत्र ठेवून त्याची परिगणना स्वतंत्र करावी व त्याचे लेखे ही जतन करावेत.

३) शासनाच्या आदेशानुसार संबंधित नागरी संस्थांना बक्षिसाची रक्कम वितरीत करण्याची कार्यवाही पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (WSSO) यांनी करावी.

४) खर्चाचा ताळमेळ महालेखापाल यांच्या कार्यालयाशी संपर्क ठेवून करावा.

५) प्रत्येक वर्षी आर्थिक वर्ष संपल्यानंतर माहे एप्रिल- मे मध्ये वितरीत निधी व जमा निधी याचा ताळमेळ प्रत्यक्ष शासनाशी करुन त्याचा अहवाल शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा.

६) लेख्यासंबंधीची सर्व कामे करावी.

७) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर कामे लेखा अधिका-याकडून करुन घ्यावीत, लेखा अधिका-याला वेतन प्राप्त होत असल्याने, सदर कामाकरिता स्वतंत्र वेतन व भत्ते दिले जाणार नाहीत.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११२१५०८११३१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramesh Francis Dsouza

Digitally signed by Ramesh Francis Dsouza
DN: CN = Ramesh Francis Dsouza, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.01.16 13:44:38 +05'30'

**(र. फ्रा. डिसोझा)**
अवर सचिव ,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, महानगरपालिका ( सर्व )
५. विभागीय आयुक्त ( सर्व )

६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, नरिमन पॉईंट, मुंबई
७. महालेखापाल (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), १/२, मुंबई/नागपूर
८. आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनाल, मुंबई
९. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०.उपसचिव, कार्यासन पापु-०४, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई
११. संचालक (वित्त) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई,
१२. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (WSSO),सिडको भवन,
बेलापूर, नवी मुंबई,
१३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
१४. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना,ठाणे,
१५. मुख्याधिकारी, नगर परिषदा (सर्व)
१६. सर्व जिल्हा प्रकल्प अधिकारी, नगर परिषद प्रशासन ,जिल्हाधिकारी कार्यालय (सर्व)
१७. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. निवडनस्ती, पापु-२१, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.